**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी (निवडश्रेणी) वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मविसे-१०१८/प्र.क्र.५०/२०१८/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.

तारीख : ५ जुलै, २०१८.

**वाचा-**

शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.मविसे-१०१५/प्र.क्र.३०१ (भाग-१) / २०१५/आस्था-३, दिनांक ०१.०८.२०१६.

**प्रस्तावना:-**

मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.१०५३/२०११ व मूळ अर्ज क्र.९७४/२०१४ बाबत दिनांक १८.१२.२०१५ रोजी मा.न्यायाधिकरणाने आरक्षणानुसार अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) मंजूर करण्यात यावी असे आदेश दिले होते.

२. त्याअनुषंगाने महाराष्ट्र विकास सेवा गट अ मधील पदांचे चार स्वतंत्र संवर्ग शासन निर्णय दिनांक ४.७.२०१६ अन्वये घोषित केले आहेत. तसेच शासन निर्णय दिनांक ६.८.२०१६ अन्वये उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी संवर्गातील काही पदे निवडश्रेणी वेतनश्रेणीसाठी चिन्हांकित करण्यात आली आहेत. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या वरील मूळ अर्जातील निर्णयानुसार अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / उप मुख्य कार्यकारी अधिकारी /गट विकास अधिकारी निवडश्रेणी वेतनश्रणी मंजूर करणे ही पदोन्नती ठरते.

३. उपरोक्त परिस्थितीत महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी संवर्गातील (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) मधील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी (निवडश्रेणी) वेतनश्रेणी (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१००, ग्रेड पे ६६००) मंजूर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी संवर्गातील (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) मधील खालील अधिकाऱ्यांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी (निवडश्रेणी) वेतनश्रेणी (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१००, ग्रेड पे ६६००) मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्रीमती पी.पी.शिंदे | खुला |
| २. | श्री.एस.पी.निकम | इमाव |
| ३. | श्री.सी.वाय.पवार | खुला |
| ४. | श्री.एन.पी.ओसवाल | खुला |
| ५. | श्रीमती पी.पी.जाखलेकर | खुला |
| ६. | श्रीमती व्ही.एम.रसाळ | खुला |
| ७. | श्री.एस.डी.बनसोडे | अ.जा. |
| ८. | श्री.के.जी.कोवे | अ.ज. |
| ९. | श्री.एन.आर.केंद्रे | भ.ज.(ड) |

२. वरील अधिकाऱ्यांपैकी श्री.एन.पी.ओसवाल, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि), जिल्हा परिषद, जालना यांना उपमुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि), जिल्हा परिषद , रायगड व श्री.एन.आर.केंद्रे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि), जिल्हा परिषद, लातूर यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी(साप्रवि), जिल्हा परिषद, जालना येथे आदेशान्वये पदस्थापना करण्यात येत आहे. श्री.ओसवाल व श्री.केंद्रे यांना संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदोन्नतीने बदली दिलेल्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कार्यमुक्त करावे.

३. वरील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी (निवडश्रेणी) वेतनश्रेणी खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) सदर निवडश्रेणी वेतनश्रेणी ही आरक्षणासंदर्भात मा . उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेली रिट याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A.१/२०१४ आणि T.A.२/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे. तसेच मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र.२७९७/२०१७ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५ महाराष्ट्र राज्य विरुध्द विजय घोगरे व इतर तसेच इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणात दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेला अंतिम निर्णय व त्याविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालामध्ये अपील दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी क्र.३३१५१/२०१७ या याचिकेवर मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

२) सदर निवडश्रेणी वेतनश्रेणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु, ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता सदर निवडश्रेणी वेतनश्रेणी देण्यात येत आहे.

४) उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी निवडश्रेणी वेतनश्रेणी पदोन्नती असल्यामुळे वरील अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती ते रुजू झालेल्या तारखेपासून महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम,१९८१ मधील ११(१) नुसार करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४१२१०५१८०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ananda Shankar Shendage

Digitally signed by Ananda Shankar Shendage
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, cn=Ananda Shankar Shendage
Date: 2018.07.05 15:24:50 +05'30'

( आ.शं.शेंडगे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९. संबधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत)
१०. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१२. निवड नस्ती (आस्था-३).